**सन २०२०-२१ मध्ये परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेंतर्गत शिक्षक व शिक्षकेतर (माध्यमिक व उच्च माध्यमिक) कर्मचाऱ्यांकरिता शासन हिस्सा व व्याजाची रक्कम वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अंनियो- ३४२०/प्र.क्र.५६/टिएनटी - ६**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
तारीख: १२ नोव्हेंबर, २०२०

**वाचा -**

१. शासन निर्णय क्र.अंनियो-१००६/(२३/०६) माशि-२, दिनांक २९/११/२०१०.

**प्रस्तावना -**

जिल्हा परिषदा मान्यताप्राप्त खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयातील १००% अनुदानित पदावरील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजनेची कार्यपध्दती संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये विशद केली आहे. सदर योजनेसाठी शासनाचा हिस्सा व व्याजासाठी संदर्भ क्र.२ अन्वये लेखाशीर्ष उघडण्यात आलेली आहे. आता सदर लेखाशीर्षाखाली निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

**सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता खालील विवरणपत्रातील स्तंभ क्र.३ अन्वये तरतूद करण्यात आली आहे. सदर एकूण तरतूदची ५०% रक्कम रू. ३९,७२,६८९ हजार इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (BEAMS) द्वारे आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना खालील विवरणपत्रानुसार वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.**

(रुपये हजारात)

| अ. क्र. | योजनेचे नाव व लेखाशीर्ष मागणी क्रमांक | सन २०२०-२१ मध्ये अर्थसंकल्पित निधी | वितरीत करण्यात येत असलेला निधी सन २०२०-२१ |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ०१, प्राथमिक शिक्षण, १०२, अशासकीय प्राथमिक शाळांना सहाय्य, (०१) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, (०१)(०१) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, मान्यताप्राप्त व अनुदानित प्राथमिक शाळांचे अंशदान, ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२०२ आय ४१४) | ७८,६२,५० | ३९,३१,२५ |

| | | | |
|---|---|---|---|
| २ | ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ११०, अशासकीय माध्यमिक शाळांना व कनिष्ठ महाविद्यालयांना सहाय्य, (०१) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, (०१)(०१) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेसाठी मान्यताप्राप्त व अनुदानित माध्यमिक शाळांचे अंशदान, ३१, सहायक अनुदाने(वेतनेतर), (२२०२ आय ४२३) | ३९३,०९,८६ | १९६,५४,९३ |
| ३ | ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य, (०३)(०१) जिल्हा परिषदांना परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेसाठी सप्रयोजन अनुदान, ३१, सहायक अनुदाने(वेतनेतर), (२२०२ एच ५९९) | १९८,००,०० | ९९,००,०० |
| ४ | ई-१, २०४९ व्याज प्रदाने, ६०, इतर दायित्वावरील व्याज, १०१, ठेवीवरील व्याज, (०१)(०२) मान्यताप्राप्त व अनुदानित प्राथमिक कर्मचाऱ्यांकरिता परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेवरील व्याज, ४५, व्याज, (२०४९ २४८९) | ६,१९,४७ | ३,०९,७३.५ |
| ५ | ई-१, २०४९ व्याज प्रदाने, ६०, इतर दायित्वावरील व्याज, १०१, ठेवीवरील व्याज, (०१)(०३) मान्यताप्राप्त व अनुदानित माध्यमिक शाळांच्या शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांकरिता परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेवरील व्याज, ४५, व्याज, (२०४९ २४९८) | ४३,७२,५२ | २१,८६,२६ |
| ६ | ई-१, २०४९ व्याज प्रदाने, ६०, इतर दायित्वावरील व्याज, १०१, ठेवीवरील व्याज, (०१)(०१) जिल्हा परिषद शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांकरिता परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेवरील व्याज, ४५, व्याज, (२०४९ २६९४) | ७४,८९,४३ | ३७,४४,७१.५ |
| | | **एकूण** | **३९,७२,६८९** |

२. सदर खर्च वरील विवरणपत्रातील संबंधित लेखाशीर्षातून सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या संबंधित लेखाशीर्षाच्या तरतूदीतून पुस्तकी समायोजनाद्वारे भागवावा, तसेच मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

३. या शासन निर्णयात मंजूर केलेली अनुदाने पुढील अटी व शर्तींच्या अधीन आहेत.

(१) उपराज्य अभिलेख देखभाल अभिकरणांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे DCPS चे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

(२) ज्या उद्दिष्टासाठी सदर निधी मंजूर करण्यात आला आहे, त्याच उद्दिष्टासाठी खर्च करण्यात यावा

(३) जिल्हा परिषदा मान्यताप्राप्त खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयातील १००% अनुदानित पदावरील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे जेवढे अंशदान या योजनेंतर्गत जमा होईल, तेवढे सममूल्य रक्कम कर्मचाऱ्यांच्या खाती जमा दाखवून तेवढाच खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षामध्ये प्रस्तूत मंजूर अनुदानातून BEAMS वर उपलब्ध करण्यात आलेल्या अनुदानातून पुस्तकी समायोजनाद्वारे भागवावा.

| अ. क्र. | **शासनाचा हिस्सा** | **भरणा करावयाचे लेखाशीर्ष** |
|---|---|---|
| १ | ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य, (०३)(०१) जिल्हा परिषदांना परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेसाठी सप्रयोजन अनुदान, ३१, सहायक अनुदाने(वेतनेतर), (२२०२ एच ५९९) | ८३४२- इतर ठेवी, ११७ - शासकीय कर्मचाऱ्यांकरिता परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना, (०१)(१५) परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना, जिल्हा परिषदेचे अंशदान, स्तर - १ (८३४२ ५४२८) |
| २ | ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ०१, प्राथमिक शिक्षण, १०२, अशासकीय प्राथमिक शाळांना सहाय्य, (०१) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, (०१)(०१) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, मान्यताप्राप्त व अनुदानित प्राथमिक शाळांचे अंशदान, ३१, सहायक अनुदाने(वेतनेतर), (२२०२ आय ४१४) | ८३४२- इतर ठेवी, ११७ - शासकीय कर्मचाऱ्यांकरिता परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना, (०१)(०३) परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना, मान्यता प्राप्त व अनुदानित प्राथमिक शाळांचे अंशदान, स्तर - १ (८३४२ ५११४) |
| ३ | ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ११०, अशासकीय माध्यमिक शाळांना व कनिष्ठ महाविद्यालयांना सहाय्य, (०१) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, (०१)(०१) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेसाठी मान्यताप्राप्त व अनुदानित माध्यमिक शाळांचे अंशदान, ३१, सहायक अनुदाने(वेतनेतर), (२२०२ आय ४२३) | ८३४२- इतर ठेवी, ११७ - शासकीय कर्मचाऱ्यांकरिता परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना, (०१)(०४) परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना, मान्यता प्राप्त व अनुदानित माध्यमिक शाळांचे अंशदान, स्तर - १ (८३४२ ५१२३) |

(४) सममुल्य अंशदानाची रक्कम शासनास भरणा केल्याबद्दल नमुना क्र. आर ७ शिक्षण अधिकारी/ शिक्षण निरिक्षक (प्राथमिक, माध्यमिक)/मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांनी संबंधित कोषागाराकडून प्रमाणित करुन घ्यावी व त्या प्रमाणपत्राच्या प्रती उपराज्य अभिलेख देखभाल अभिकरणाकडे दरमहा पाठवाव्यात. उपराज्य अभिलेख देखभाल अभिकरणाने कर्मचाऱ्यांकडून जमा झालेल्या व शासन खाती जमा केलेल्या रकमांच्या चलनाच्या प्रती नमुना आर २ मधील माहितीसह नियंत्रकांना पाठवाव्या. तसेच

नियोक्त्याचे अंशदान भरणा केल्यानंतर त्या चलनांच्या प्रतीही नियंत्रक यांच्याकडे न चुकता पाठवाव्यात. नियंत्रकानी उपराज्य अभिलेख देखभाल अभिकरणनिहाय माहिती महिनानिहाय एकत्रित करुन अशी माहिती उपसचिव (टिएनटी), शालेय शिक्षण विभाग व राज्य अभिलेख अभिकरण, मुंबई यांच्याकडे प्रत्येक महिन्यात न चुकता पाठवावी. तसेच हा खर्च याच कारणांसाठी खर्च करण्यात आला असल्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, तसेच या विभागास पाठवावे.

(५) वित्त विभागाने प्रत्येक वर्षी व्याजाचे दर निश्चित करणारे शासन निर्णय निर्गमित केले आहेत. तसेच व्याजाची परिगणना करताना वित्त विभाग परिपत्रक क्र.अंनियो १०१०/प्र.क्र.६७/सेवा-४, दिनांक १६ नोव्हेंबर, २०१२ नुसार कार्यवाही करण्याची दक्षता घ्यावी. त्यानुसारच विहित दराने व्याजाची आकारणी करण्यासंदर्भातील कार्यवाही उपराज्य अभिलेख देखभाल अभिकरणाने करुन नमुना ४५ अ मध्ये व्याजाची रक्कम आहरित करण्याकरिता निरंक रक्कमेचे देयक कोषागारात सादर करावे. देयकासोबत ज्या कर्मचाऱ्यांच्या खाती व्याज जमा करावयाचे आहे त्या कर्मचाऱ्यांची यादी जोडण्याची आवश्यकता नाही. तथापि, रक्कम अचूक असल्याची खात्री केल्याबाबत उपराज्य अभिलेख देखभाल अभिकरणाने देयकात प्रमाणित करावे. या संदर्भातील माहिती उपराज्य अभिलेख देखभाल अभिकराने नियंत्रक अधिकाऱ्यांना पाठवावी. तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी उपसचिव (टिएनटी), शालेय शिक्षण विभाग व राज्य अभिलेख अभिकरण, मुंबई यांच्याकडे प्रत्येक महिन्यात न चुकता पाठवावी.

(६) जिल्हा परिषदा मान्यताप्राप्त खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयातील १००% अनुदानित पदावरील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे मासिक अंशदान व त्यावरील शासनाचे अंशदान अशा एकत्रित रकमेवरील व्याज खालील लेखाशीर्षामध्ये प्रस्तूत मंजूर अनुदानातून BEAMS वर उपलब्ध करण्यात आलेल्या अनुदानातून पुस्तकी समायोजनाद्वारे भागवावा.

| अ. क्र. | **व्याजाचे लेखाशीर्ष** | **भरणा करावयाचे लेखाशीर्ष** |
|---|---|---|
| १ | ई-१, २०४९ व्याज प्रदाने, ६०, इतर दायित्वावरील व्याज, (०१)(०१) जिल्हा परिषद शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांकरिता परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेवरील व्याज, ४५, व्याज, (२०४९ २२४६) | ८३४२- इतर ठेवी, ११७ - शासकीय कर्मचाऱ्यांकरिता परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना, (०१)(१५) परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना, जिल्हा परिषदेचे अंशदान, स्तर - १ (८३४२ ५४२८) |
| २ | ई-१, २०४९ व्याज प्रदाने, ६०, इतर दायित्वावरील व्याज, (०१)(०२) मान्यताप्राप्त व अनुदानित प्राथमिक कर्मचाऱ्यांकरिता परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेवरील व्याज, ४५, व्याज, (२०४९ २४८९) | ८३४२- इतर ठेवी, ११७ - शासकीय कर्मचाऱ्यांकरिता परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना, (०१)(०३) परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना, मान्यता प्राप्त व अनुदानित प्राथमिक शाळांचे अंशदान, स्तर - १ (८३४२ ५११४) |

| | | |
|---|---|---|
| ३ | ई-१, २०४९ व्याज प्रदाने, ६०, इतर दायित्वावरील व्याज, (०१)(०३) मान्यताप्राप्त व अनुदानित माध्यमिक शाळांच्या शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांकरिता परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेवरील व्याज, ४५, व्याज, (२०४९ २४९८) | ८३४२- इतर ठेवी, ११७ - शासकीय कर्मचाऱ्यांकरिता परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना, (०१)(०४) परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना, मान्यता प्राप्त व अनुदानित माध्यमिक शाळांचे अंशदान, स्तर - १ (८३४२ ५१२३) |

(७) महालेखापाल, महाराष्ट्र -१ व २ मुंबई/नागपूर यांना लेखापरिक्षणाकरिता पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व अनौपचारिक संदर्भ क्र. ४९५/२०२०/व्यय ५, दिनांक २७/१०/२०२० अन्वये व शासन निर्णय क्र.अंनियो-१००६/(२३/०६) माशि-२, दिनांक २९/११/२०१० मधील अटी व शर्तींच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१११२१७३६३४३७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VARSHA MILIND KARANDIKAR

Digitally signed by VARSHA MILIND KARANDIKAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=3f5189bc4e5751dd492acf5c90b732e1e04b7ae09704574983de5a9ea7bdbef5, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=1f6f75a359ad152edc7163322a272f034b3410680f731760fce9dad40de05c86, ou=SCHOOL EDUCATION DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VARSHA MILIND KARANDIKAR
Date: 2020.11.17 17:22:58 +05'30'

**( व. मि. करंदीकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा / विधानपरिषद, मुंबई
५. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा. विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य
८. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
९. मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
१०. मा. मंत्री (शालेय शिक्षण / क्रीडा) यांचे स्वीय सहायक
११. मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण / क्रीडा) यांचे स्वीय सहायक
१२. अप्पर मुख्य सचिव (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १ / २, मुंबई / नागपूर

१४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १ / २, मुंबई / नागपूर
१५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१७. स्थानिक निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१८. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे
१९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२०. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२१. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नीरोड, मुंबई
२२. सहसचिव / उपसचिव (विद्यार्थी विकास / शाळा व्यवस्थापन / शिक्षक शिक्षकेतर / प्रशासन / समन्वय / अर्थसंकल्प / क्रीडा ) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
२३. शिक्षण संचालक (माध्य. व उच्च माध्य. / प्राथमिक / प्रौढ व अल्पसंख्यांक / SCERT / महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद) महाराष्ट्र राज्य, पुणे
२४. अध्यक्ष, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, महाराष्ट्र राज्य, पुणे
२५. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
२६. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद
२७. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक / प्रौढ)
२८. सर्व अधिक्षक, वेतन पथक (प्राथमिक / माध्यमिक)
२९. वित्त विभाग (व्यय-५ / व्यय-१४ / अर्थसंकल्प - ८) मंत्रालय, मुंबई
३०. सर्व कार्यासने, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३१. निवड नस्ती, कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.